**पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या संकेतस्थळावरील माहिती अद्ययावत करणेबाबत**

**महाराष्ट्र शासन**
**पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग**
**शासन परिपत्रक क्रमांकः संस्थमा-२०२१/प्र.क्र.०७/संगणक**
सातवा मजला, गोकुळदास तेजपाल रुग्णालय संकुल,
क्रॅाफर्ड मार्केट जवळ, लोकमान्य टिळक मार्ग, मुंबई
तारीख: २१ सप्टेंबर,२०२१

**शासन परिपत्रक-**

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाची माहिती जनतेच्या सुविधेसाठी विभागाचे संकेतस्थळ - water.maharashtra.gov.in यावर उपलब्ध असते. सध्याच्या माहिती तंत्रज्ञानाच्या काळात सदर माहिती वेळोवेळी अद्ययावत करणे आवश्यक आहे. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागामार्फत राबविण्यात येणा-या योजना, महत्वाचा पत्रव्यवहार, वेळोवेळी लागणारे महत्वाचे शासन निर्णय, परिपत्रके इत्यादी बाबतची माहिती विभागाच्या संकेतस्थळावर दर तीन महिन्यांनी अद्ययावत करणे आवश्यक आहे. यातील माहितीसाठी संबंधित कार्यासनातील जबाबदार अधिका-यांची यादी परिपत्रकासोबतच्या **परिशिष्ट-"अ"** वर असून त्यांना वेबसाईटवरील जबाबदार अधिकारी म्हणून नामनिर्देशित करण्यात येत आहे.

या अधिका-यांनी दर तीन महिन्यांनी आपल्या विषयाशी संबंधित संकेतस्थळावरील माहिती तपासावी. सदरहू माहिती अद्ययावत असल्यास "माहिती अद्ययावत आहे" असे **परिशिष्ट-"ब"** नुसार प्रमाणित करावे. नसल्यास, याबाबतची अद्यायावत माहिती Soft copy व Hard Copy मध्ये संगणक कक्षास उपलब्ध करुन माहिती अद्ययावत करुन घ्यावी व त्यानंतर प्रमाणित करावे.

विभागाचे संकेतस्थळ अद्ययावत ठेवण्यासाठी विभागातील सर्व कर्मचारी/ अधिकारी यांनी विभागाच्या संकेतस्थळासंदर्भात काही सूचना/ निर्देश असल्यास याबाबत वेळोवेळी संगणक कक्षास अवगत करावे.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१०९१५१३१६४३००२८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Saroj Rajesh Deshpande

Digitally signed by Saroj Rajesh Deshpande
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Supply And Sanitation Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=6a31a46110f5bc3d6fc7bdf1d6619a227d04e20859a66b7faddf9190ac096802, cn=Saroj Rajesh Deshpande
Date: 2021.09.21 13:09:01 +05'30'

**(सरोज देशपांडे)**
कार्यासन अधिकारी,महाराष्ट्र शासन

प्रत,

१. सह सचिव (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
२. उप सचिव (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
३. मुख्य अभियंता तथा विशेष कार्य अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
४. अवर सचिव (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
५. कक्ष अधिकारी (सर्व), पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई.

## शासन परिपत्रक संस्थमा-२०२१/ प्र.क्र.०७/ संगणक सोबतचे परिशिष्ट - अ

# वेब माहीती अधिकारी/नियंत्रण अधिकारी

| अनु क्र. | शीर्षक | वेब माहीती अधिकारी | वेब माहीती नियंत्रण अधिकारी |
|---|---|---|---|
| १ | आमच्याविषयी | क.अ.- पापु-०१ | उप सचिव |
| २ | संघटनात्मक रचना | क.अ.- पापु-०१ | उप सचिव |
| ३ | अधिकारी संपर्क | क.अ. - पापु-०१ | उप सचिव |
| ४ | कार्यक्रम -जल जीवन मिशन | क.अ. -पापु-१० | सह सचिव |
| ५ | कार्यक्रम -धोरण | क.अ.- पापु-०७ | सह सचिव |
| ६ | कार्यक्रम- स्वच्छ भारत मिशन | क.अ.- पापु-१६ | सह सचिव |
| ७ | कार्यक्रम- जल स्वराज्य | क.अ.- पापु-११ | सह सचिव |
| ८ | कार्यक्रम- अटल भुजल | क.अ. -पापु-१५ | सह सचिव |
| ९ | कार्यक्रम - मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल | क.अ. -पापु-१५ | वि. का.अ |
| १० | कार्यक्रम- मराठवाडा वॉटर ग्रीड | क.अ. -पापु-१८ | सह सचिव |
| ११ | सेवा हमी कायदा | क.अ. -पापु-०२ | उप सचिव |
| | योजना | | |
| १२ | महाराष्ट्र सुजल निर्मल अभियान | क.अ. -पापु-२१ | सह सचिव |
| १३ | शहरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजना अनुदान | क.अ. -पापु-२२ | सह सचिव |
| १५ | सुजल निर्मल शहरी दलित वस्ती पाणी पुरवठा योजना | क.अ. -पापु-२२ | सह सचिव |
| १७ | स्वच्छ भारत मिशन (ग्रा.) | क.अ.- पापु-१६ | सह सचिव |
| १८ | मुख्यमंत्री ग्रामीण पेयजल कार्यक्रम | क.अ.- पापु-१९ | सह सचिव |
| १९ | माहितीचा अधिकार | क.अ. -पापु-०१ | उप सचिव |
| २० | साप्ताहिक टॅकर अहवाल | क.अ.- पापु-१४ | उप सचिव |
| २१ | जल जीवन मिशन | क.अ. - पापु-१० | सह सचिव |
| २२ | आमच्या यंत्रणा | क.अ. पापु-१५ | सह सचिव |
| २३ | मजीप्रा | क.अ. पापु-२३ | उप सचिव |

| | | | |
|---|---|---|---|
| | महत्वाचे दुवे | | |
| २४ | कायदे/नियम | क.अ. पापु-०७ | सह सचिव |
| | | क.अ. पापु-१५ | सह सचिव |
| २५ | ई निविदा/दरपत्रक | क.अ. पापु-०२ | सह सचिव |
| २६ | नागरिकांची सनद | क.अ. पापु-०१ | सह सचिव |
| २७ | विभागात कार्यरत अ. मु.स. /प्र. स. / सचिव यांच्या कार्यकाळाचा तपशील | क.अ. पापु-०१ | सह सचिव |
| २८ | विभागातील मंत्री / अधिकारी यांचे विदेश अभ्यास दौ-याची व खर्चाची माहिती | क.अ. पापु-११, क.अ. पापु-२५ | सह सचिव |
| २९ | विभागाशी संबंधित महत्वाचे शासन निर्णय | क.अ. पापु-०७ /समन्वय | सह सचिव |
| ३० | मंत्रालयात दिनांक २१.०६.२०१३ रोजी भीषण आगीत नष्ट झालेल्या पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या नस्त्यांची माहिती | क.अ. पापु-०१ | सह सचिव |
| ३१ | कार्यक्रम अंदाजपत्रक | क.अ. पापु-०४ | सह सचिव |
| ३२ | राज्य पाणी व स्वच्छता मिशन संबंदित बाबी | क.अ. पापु ०७ | सह सचिव |

**शासन परिपत्रक संस्थमा-२०२१/ प्र.क्र.०७/ संगणक सोबतचे परिशिष्ट - ब**

## प्रमाणपत्र

पाणी पुरवठा व स्वच्छता विभागाच्या water.maharashtra.gov.in या संकेतस्थळावरील .................... या शिर्षकाखाली माहिती .............................. या कार्यासनाशी संबंधित आहे.

सदर माहिती तपासून ती अद्ययावत आहे, असे प्रमाणित करण्यात येत आहे.

कक्ष अधिकारी/ जबाबदार अधिकारी                                        नियंत्रण अधिकारी